**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता निधी वितरण.**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२०२ आय ६५७)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२३**/ प्र.क्र.०४ / कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२२.
२) शा.नि.आ.वि.वि.क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.०४/का-६, दि.३१.०३.२०२३.
३) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र.समग्र-२०२३/प्र.क्र. १(भाग-२)/एस.डी.-१.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या समग्र शिक्षा अभियान योजनेसाठी अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील प्राप्त झालेला केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिश्याकरीता उपलब्ध निधी सं.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अन्वये वितरीत करण्यात आला आहे. तथापि, राज्य हिश्याकरीता कमी प्रमाणात निधी वितरीत करण्यात आला होता. या अनुषंगाने केंद्र हिश्श्याच्या समरूप प्रलंबित राज्य हिश्श्यासाठी रु.९६९.७१ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशीर्षातर्गत समग्र शिक्षा अभियान या योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीखाली सन २०२२-२३ मधील प्रलंबित समरूप राज्य हिश्श्यासाठी रु.९६९.७१ लाख इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व समरुप राज्य हिस्सा | बाब | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| समग्र शिक्षा अभियान | २२०२ आय ६५७ राज्य हिस्सा (४०%) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर | **५९४२.२१** | **९६९.७१** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.९६९.७१ लाख (अक्षरी रुपये नऊ कोटी एकोणसत्तर लाख एकाहत्तर हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील. यामध्ये प्रामुख्याने आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याच्या योजनेसह वैयक्तिक लाभाच्या योजना राबविता येतील. मात्र आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.५२३-२०२३/व्यय-१४, दि.२६.०५.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०२१५३९४७२१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.06.02 16:42:17 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती/ठाणे.
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग ( अर्थोपाय / अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती, (कार्यासन-०६), आदिवासी विकास विभाग.